राज्यातील कारागृहातील कैद्यांना पुरविण्यात येणाऱ्या आहार व स्वच्छतेबाबत तपासणी करण्याकरीता समिती गठीत करण्याबाबत...

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : जेएलएम-१३१६/प्र.क्र.८/तुरुंग-२**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- १९ जून, २०१७.

**वाचा** :- (१) उच्च न्यायालय मुंबई जनहित याचिका क्र. ४६/२०१५ व १६७/२०१५ मध्ये मा.उच्च न्यायालयाचे दि. ०१.०३.२०१७ रोजीचे आदेश.
(२) गृह विभाग परिपत्रक क्र.जेएलएम १०१२/प्र.क्र.२०/तुरुंग-२,दि.६ सप्टेंबर,२०१२

**प्रस्तावना** :-

राज्यातील कारागृहातील न्यायाधिन किंवा सिध्ददोष बंद्यांच्या तक्रारी व आरोप किंवा गाऱ्हाण्यावर करावयाच्या कार्यवाहीबाबत सूचना उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या परिपत्रकान्वये देण्यात आल्या आहेत त्यानुसार कारागृह भेटीच्या वेळी कारागृह महानिरीक्षक, कारागृह उपमहानिरीक्षक, जिल्हा न्यायाधिश आणि मानवी हक्क आयोगाचे सदस्य यांना उपरोक्त परिपत्रकात नमूद केलेल्या बाबी पडताळणीसाठी सूचना देण्यात आल्या आहेत.

मा. उच्च न्यायालय, मुंबई खंडपीठ मुंबई येथील जनहित याचिका क्र. ४६/२०१५ व १६७/२०१५ मध्ये दि.०१.०३.२०१७ रोजी आदेश पारित केले आहेत या अनुषंगाने कारागृहातील कैद्यांना पुरविण्यात येणाऱ्या आहार व स्वच्छतेबाबत अचानक कारागृहास भेट देऊन तपासणी करण्याकरीता आहारतज्ञ व समाज सेवक यांचा समावेश करुन समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपरोक्त आदेशाच्या अनुषंगाने खालील प्रमाणे समिती गठित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पदनाम |
|---|---|---|
| १ | जिल्हा शल्य चिकित्सक यांनी नामनिर्देशित केलेले जिल्हा रुग्णालयाचे आहार तज्ञ | अध्यक्ष |
| २ | समाजसेवक-पुरुष | सदस्य |
| ३ | समाजसेवक-महिला | सदस्य |

२. उपरोक्त समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

१. समितीने आदर्श कारागृह संहिता,२०१६ मधील तरतुदीनुसार बंद्यांना देण्यात येणाऱ्या आहाराची गुणवत्ता, स्वयंपाकगृहातील आरोग्य व स्वच्छता योग्य असल्याची खात्री करण्यासाठी महिन्यातून कमीतकमी १ वेळेस अचानक भेट देऊन तपासणी करणे व त्याबाबतचा अहवाल अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा पुणे यांना नियमित सादर करणे.

२. अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक कारागृह व सुधारसेवा पुणे समितीने सादर केलेल्या अहवालाच्या अनुषंगाने उपाययोजना/ कार्यवाही करणे.

३. उपरोक्त समितीतील समाज सेवक यांचे नामनिर्देशन संबंधित जिल्हाधिकारी यांनी जिल्ह्यातील या क्षेत्रातील कार्यरत असलेल्या अशासकीय सेवाभावी संस्था यांचेमधून योग्य त्या व्यक्तीचे नांव नामनिर्देशित करावे. संचालक आरोग्य सेवा,मुंबई यांनी जिल्हा शल्य चिकित्सकांना जिल्ह्यातील समितीवर जिल्हा रुग्णालयातील एका आहारतज्ञाला अध्यक्ष म्हणून नामनिर्देशित करण्याच्या सूचना द्याव्यात.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०१७०६१९१७५२३३९४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Prabhakar Atmaram Sankhe

Digitally signed by Prabhakar Atmaram Sankhe
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16ca9b273a3e790c4aab4c479015f44d506ae481c2dc55f48d889691ffa9939a, cn=Prabhakar Atmaram Sankhe
Date: 2017.06.19 17:51:55 +05'30'

**( प्रभाकर संखे )**
कक्ष अधिकारी, गृह विभाग

**प्रत,**

१) मा .मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय मुंबई -३२
२) मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय मुंबई -३२
३) सर्व जिल्हाधिकारी
४) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधार सेवा, महाराष्ट्र राज्य , पुणे
५) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य भवन,मुंबई.
६) प्रबंधक, उच्च न्यायालय , मुंबई
७) शासकीय अभियोक्ता ( फौजदारी शाखा ) उच्च न्यायालय, मुंबई
८) निवडनस्ती-तुरुंग-२